महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग

शासन ज्ञापन क्रमांक संकीर्ण-२०२५ /प्र.क्र.७/र.व का.-१.

६३१, मंत्रालय (विस्तार), मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई. पिन ४०० ०३२.

दिनांक : १६ एप्रिल, २०२५.

विषय :- शासनाचे प्रशासनिक विभाग आणि क्षेत्रीय शासकीय व निमशासकीय कार्यालये यांना नेमून दिलेला १०० दिवसांचा कृती आराखडा:

अंतिम मूल्यमापनाच्या खर्चास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

वाचा :- शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक संकीर्ण-२०२५/प्र.क्र.७/र.व का.-१, दि.१३.०१.२०२५ व दि.१९.०३.२०२५.

ज्ञापन.

शासनाच्या प्रशासनिक विभागांना आणि क्षेत्रीय शासकीय व निमशासकीय कार्यालयांना नेमून दिलेल्या १०० दिवसांच्या कृती आराखड्यानुसार त्यांच्या कामगिरीचे अंतिम मूल्यमापन करण्यासाठी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक संकीर्ण-२०२५/प्र.क्र.७/र.वका-१, दि.१९.०३.२०२५, द्वारे भारतीय गुणवत्ता परिषद या संस्थेची नियुक्ती करण्यात आली आहे.

२. उक्त अंतिम मूल्यमापनाच्या पहिल्या टप्प्यात (दि.२१.०४.२०२५ ते दि.२८.०४.२०२५) एकूण ५३ कार्यालयांचे आणि दुस-या टप्प्यात (दि.०६.०५.२०२५ ते दि.१४.०५.२०२५) एकूण ४५८ कार्यालयांचे मूल्यमापन भारतीय गुणवत्ता परिषदेकडून करण्यात येईल. त्याकरिता उक्त परिषदेने रु.७८,१७,२६४/- *(रुपये अठ्ठ्याहत्तर लक्ष, सतरा हजार, दोनशे चौसष्ट फक्त)* इतका खर्च प्रस्तावित केला आहे.

३. तसेच, उक्त अंतिम मूल्यमापनानुसार उत्कृष्ट ठरतील त्या विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना प्रमाणपत्र देऊन त्यांचा गौरव करण्यासाठी शासकीय समारंभ आयोजित करावयाचा आहे. त्याकरिता अंदाजे रु.५,००,०००/- (रुपये पाच लक्ष फक्त) इतका खर्च अपेक्षित आहे.

४. त्या अनुसार, शासनाच्या प्रशासनिक विभागांना आणि क्षेत्रीय शासकीय व निमशासकीय कार्यालयांना नेमून दिलेल्या १०० दिवसांच्या कृती आराखड्याप्रमाणे त्यांच्या कामगिरीचे अंतिम मूल्यमापन करण्यासाठी भारतीय गुणवत्ता परिषदेस रु.७८,१७,२६४/- *(रुपये अठ्ठ्याहत्तर लक्ष, सतरा हजार, दोनशे चौसष्ट फक्त)* प्रदान करण्यास आणि अंतिम मूल्यमापनानुसार उत्कृष्ट ठरतील त्या विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना प्रमाणपत्र देऊन त्यांचा गौरव करण्यासाठी शासकीय समारंभाचे आयोजन करण्यासाठी अंदाजे रु.५,००,०००/- (रुपये पाच लक्ष फक्त) अशा एकूण रु.८३,१७,२६४/- *(रुपये त्र्याऐंशी लक्ष, सतरा हजार, दोनशे चौसष्ट फक्त)* इतक्या खर्चास, याद्वारे, प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

४. उक्त खर्च हा सामान्य प्रशासन विभाग- मागणी क्रमांक ए-४, २०५२ सचिवालयीन- सर्वसाधारण सेवा, ०० ०९० सचिवालय (००), (००)(०१) सामान्य प्रशासन विभाग (अनिवार्य) (२०५२००२५), १३ कार्यालयीन खर्च, या लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्षात (सन २०२५-२६) उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

६. उक्त रु.८३,१७,२६४/- इतकी रक्कम अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई, येथून आहरित करण्यासाठी कक्ष अधिकारी, रोख शाखा, सामान्य प्रशासन विभाग, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. हे शासन ज्ञापन नियोजन विभागाच्या सहमतीने (अनौ. संदर्भ क्र.२७७/२०२५/का.१४३३, दि.०७.०४.२०२५) आणि वित्त विभागाच्या मान्यतेने (अनौ. संदर्भ क्र.३१८/व्यय-४, दि.०८.०४.२०२५) निर्गमित करण्यात येत आहे.

८. शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४१६१३१७३४४००७ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAHAJAHAN SHAKUR MULANI

Digitally signed by SHAHAJAHAN SHAKUR MULANI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=d203fe3b025c07c7692f5c23a43a4905f46cdde0ef54f3944caf1c620a5bc64e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BF4EB2A0C007D6CA5A25B0E564499E5FF904468E1A96902315E3E67299424039, cn=SHAHAJAHAN SHAKUR MULANI
Date: 2025.04.16 13:18:47 +05'30'

**(शहाजहान मुलाणी)**
**शासनाचे उपसचिव.**

**प्रति,**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी/लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२) अवर सचिव (रोखशाखा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (रोखशाखेच्या मार्फत).
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

**प्रत-**

१) महासचिव, क्वालिटी काउंसिल ऑफ इंडिया, इंस्टीट्यूशन ऑफ इंजीनियर्स बिल्डिंग, दुसरा मजला, २, बहादूर शाह जफर मार्ग, नवी दिल्ली-११०००२.
२) निवड नस्ती, र.व का-१.